**कोषागारातून रोख देय अनुदान** **अर्थसंकल्पीय अनुदान २०११-१२**

महाजल कार्यक्रमांतर्गत ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीसाठी अनुदाने.

**लेखाशिर्ष (२२१५ २०८२)**

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,

शासन निर्णय क्र. देप्रोअ-०५११ / प्र.क्र. ६२/ पापु-०८,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२ दिनांक १७ नोव्हेंबर, २०११

संदर्भ : - १) शासन निर्णय क्र. देप्रोअ-०५११/प्र.क्र.६२/ पापु-०८, दिनांक १७ जून, २०११

२) शासन निर्णय क्र. देप्रोअ-०५११/प्र.क्र.६२/ पापु-०८, दिनांक २८ सप्टेंबर, २०११

**प्रस्तावना :-**

ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीसाठी उपलेखाशिर्ष २२१५ २०८२ खाली आर्थिक वर्ष २०११-१२ मध्ये रु. २४००.०० लक्ष इतकी तरतूद मंजूर आहे. या तरतूदीपैकी उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयांन्वये रू. ७,५७,५९,०००/- इतका निधी जिल्हा परिषदांना वितरीत करण्यात आला आहे.

कॅश-फ्लो प्रमाणे माहे नोव्हेंबर, २०११ करिता संगणक वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेल्या निधीतून सदर महिन्यात रु. २,००,००,०००/- एवढा निधी संगणक वितरण प्रणालीद्वारे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार, आर्थिक वर्ष २०११-१२ मध्ये ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीसाठी उपलेखाशिर्ष २२१५ २०८२ खाली उपलब्ध रु. **२,००,००,०००/- (रूपये दोन कोटी फक्त)** तरतूद शासन, अमरावती जिल्ह्यातील दर्यापूर, अंजनगाव, भातुकली तालुक्यातील १५६ गावांच्या सामुहिक (गुरुत्वाधारीत) पाणी पुरवठा योजनेसाठी वित्तीय सल्लागार व मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बेलापूर, नवी मुंबई यांना माहे नोव्हेंबर, २०११ मधील कॅश-फ्लो नुसार पुढील अटींवर रोख मंजूर व मुक्त करीत आहे.

अ) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने हे अनुदान सन- २०११-१२ या आर्थिक वर्षात केवळ उक्त नमूद केलेल्या पाणी पुरवठा योजनेच्या देखभाल दुरुस्तीसाठी शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांनुसार खर्च करावयाचे आहे.

ब) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

क) वरील अटी/शर्तीची जिल्हा महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून पूर्तता होत आहे ह्याची शासनाला खात्री करुन घेता यावी म्हणून महालेखापाल, महाराष्ट्र- १/२, मुंबई/नागपूर यांना तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिका-यास लेखा परिक्षणाकरीता प्राधिकरणाची पुस्तके व लेखे पाहण्याचा अधिकार राहील, महालेखापाल यांना त्यांचे काम योग्य त-हेने पार पाडता यावे म्हणून प्राधिकरण संपूर्ण मदत व सुविधा पुरवतील.

ड) शासनाने वेळोवेळी निर्गमीत केलेल्या सूचनेप्रमाणे या अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहीत दिनांकाना या विभागातील कार्यासन क्र. पापु-०५, पापु-०८ व पापु- २० ला सादर करावे.

ई) या मंजूर अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे शासनास सादर करावीत. प्रमाणपत्रामध्ये दर्शविलेल्या खर्चाच्या रकमा प्राधिकरणाचे वित्तीय सल्लागार व मुख्य लेखाधिकारी यांनी प्रमाणित करुन स्वाक्षरीत कराव्यात व ती प्रमाणपत्रे प्राधिकरणाचे सदस्य सचिव यांनी प्रतिस्वाक्षरीत कराव्यात.

२. वर मुक्त करण्यात आलेले अनुदान प्राप्त करुन घेण्यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे सदस्य सचिव किंवा वित्तीय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, श्री.का.मा.विधाते यांच्या सहीने तयार केलेले व पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील उप सचिव, श्री. दु.र चंद्रिकापुरे यांनी प्रतिस्वाक्षरीत केलेले देयक अधिदान व लेखा अधिकारी यांना सादर करावे. तसेच उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांना प्राधिकरणाने सदर केलेल्या देयकावर प्रतिस्वाक्षरी करण्याचे अधिकार देण्यात आलेले आहेत. **सदर रक्कम इसीएस प्रणालीव्दारे महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांच्या खाती जमा करण्यात यावी.**

३. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. वाय- २, **“**२२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता-१०२- ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम (०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने (०२) (१६) नळाद्वारे पाणी पुरवठा योजना-परिरक्षण व दुरुस्ती यासाठी अनुदान (२२१५ २०८२) ३१, सहायक अनुदान (वेतनेतर)**”** या लेखाशिर्षाखाली सन २०११-१२ या वर्षाच्या उपलब्ध तरतूदीतून खर्ची घालावा.

४. सदर निधी तात्काळ आहरीत करुन घ्यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या मान्यतेने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३९४/११, व्यय-०३, दि. २१.१०.२०११ नुसार व वित्त विभाग परिपत्रक क्र. अंदाज-२०.११/प्र.क्र. ९३/२०११/अर्थसंकल्प-३, दि. २१.९.२०११ मधील तरतूदींनुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून यांच्या संगणक संकेतांक २०११११११०१३२३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सही/-

**( ल. गो. ढोके )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
२) वित्तीय सल्लागार व मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बेलापूर, नवी मुंबई
३) मुख्य अभियंता, भारत निर्माण कक्ष, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
४) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
५) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
६) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ ,मुंबई / नागपूर (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता)
७) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई.
८) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अमरावती
९) अधीक्षक अभियंता, विभागीय भारत निर्माण कक्ष, अमरावती
१०) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग, अमरावती/अकोला
११) नियोजन / वित्त विभाग (व्यय-३), मंत्रालय, मुंबई
१२) पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासने क्र. पापु-०४, पापु-५ व पापु-२०
१३) निवडनस्ती, पापु-०८